**डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला अंतर्गत बुलढाणा येथे नवीन शासकीय कृषि महाविद्यालय स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: पंदेवि-१३१६/प्र.क्र.११५/७-अे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०००३२
दिनांक : १३/०७/२०२३

**संदर्भ :-** १.मा.मंत्री (वित्त) यांचे अर्थसंकल्पिय भाषण सन २०१६-१७
२. महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे यांचे जा.क्र.मकृप/शिक्षण १/ ११११६/२५१२ दि.२९.०९.२०१६ चे पत्र.
३. महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे यांचे जा.क्र.मकृप/शिक्षण १/ प्र.क्र.६०१२/८२९/२०१८ दि.१०.०४.२०१८ चे पत्र.
४. महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेच्या ९६ व्या बैठकीचे इतिवृत्त दि.३०.०६.२०१८
५. महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांचे जा.क्र.मकृप/शिक्षण १/ प्र.क्र.२९१८/२६५७ दि.२३.११.२०२२ चे पत्र.
६. महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांचे जा.क्र.मकृप/शिक्षण१ / प्र.क्र.२९१८/१११०/२०२३ दि.२०.०४.२०२३ चे पत्र.

**प्रस्तावना:-**

बुलढाणा जिल्ह्यातील प्रमुख व्यवसाय हा शेती असून लोकांच्या उपजिविकेचे साधन प्रामुख्याने शेती व जंगल आधारीत आहे. सद्यस्थितीत बुलढाणा जिल्ह्यात एकही शासकीय कृषि महाविद्यालय कार्यरत नाही. बुलढाणा जिल्ह्यामध्ये शासकीय कृषि महाविद्यालय स्थापन झाल्यास सध्या प्रचलित असलेला चार वर्षांचा कृषि पदवी हा अभ्यासक्रम पूर्ण करणाऱ्या ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांना कृषि शिक्षणाची जोड दिल्यास पदवी प्राप्त केलेले विद्यार्थी परिसरात तज्ञ प्रशिक्षक म्हणून कार्य करू शकतील. स्वयंरोजगारावर आधारित कृषि उद्योग उभे करण्यासाठी मनुष्यबळ स्थानिक पातळीवर उपलब्ध होईल. तसेच ग्रामीण भागातील शेतकऱ्यांना कृषि सेवा व सल्ला उपलब्ध होऊन शेतीचे उत्पादन वाढविण्यास मदत होणार आहे. सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पिय भाषणात मा.मंत्री (वित्त) यांनी बुलढाणा येथे कृषि महाविद्यालय स्थापन करण्याची घोषणा केली आहे. त्यासअनुसरून बुलढाणा जिल्ह्यात कृषि महाविद्यालय स्थापन करणे बाबतचा प्रस्ताव महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे यांच्याकडून प्राप्त झालेला आहे.

भारतीय कृषि अनुसंधान परिषद,नवी दिल्ली यांच्या ५ व्या अधिष्ठाता समितीच्या निकषानुसार ६० विद्यार्थी प्रतिवर्ष प्रवेश क्षमतचे नवीन कृषि महाविद्यालय स्थापन करण्यासाठी किमान ३० हेक्टर जमिनीची आवश्यकता आहे. डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला अंतर्गत घटक कृषि तंत्र

विद्यालय, कृषि संशोधन केंद्र आणि कृषि विज्ञान केंद्राच्या कार्यक्षेत्रातील १३० हेक्टर जमिनीपैकी ३० हेक्टर जमीन प्रस्तावित महाविद्यालयासाठी उपलब्ध करून देण्यात येणार आहे.

भारतीय कृषि अनुसंधान परिषदेच्या ५ व्या अधिष्ठाता समितीच्या शिफारशीनुसार बुलढाणा येथे नवीन शासन अनुदानित घटक कृषि महाविद्यालय स्थापन करण्यासाठी आवश्यक प्रस्तावास डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला यांच्या कार्यकारी परिषदेने दि.२८/०५/२०१८ रोजी झालेल्या ३१८ व्या बैठकीतील ठराव क. काप/५०/२०१८ अन्वये मान्यता दिलेली आहे. तसेच महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांच्या दिनांक २७/०६/२०१८ रोजी संपन्न झालेल्या ९६ व्या बैठकीमध्ये डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत बुलढाणा येथे शासकीय कृषि महाविद्यालय स्थापन करण्याच्या प्रस्तावास ठराव क्रमांक ०६/९६/२०१८ अन्वये मान्यता देण्यात आली असून प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केलेला आहे, त्यासअनुसरून डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत बुलढाणा येथे नविन शासकीय महाविद्यालय स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

१. डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत बुलढाणा येथे ६० विद्यार्थी प्रती वर्ष प्रवेश क्षमता असलेले शासकीय कृषि महाविद्यालय सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षापासून सुरू करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर महाविद्यालयाचे “भाऊसाहेब फुंडकर शासकीय कृषि महाविद्यालय,बुलढाणा” असे नामकरण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर महाविद्यालयासाठी भारतीय कृषि अनुसंधान परिषद, नवी दिल्ली यांच्या ५ व्या अधिष्ठाता समितीच्या निकषानुसार शिक्षकवर्गीय ४५ व शिक्षकेत्तर ४३ पदे मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या मान्यतेच्या अधीन राहून निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. बुलढाणा महाविद्यालयासाठी शिक्षकीय/शिक्षकेतर पदांच्या वेतनासाठी रू.४७७२.३३ लाख, आवर्ती खर्च रू.११२.९२ लाख व अनावर्ती खर्च रू.९७६९.०० लाख अशा एकूण रू.१४६५४ लाख खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

५. बुलढाणा येथे शासकीय कृषि महाविद्यालयासाठी आवश्यक मनुष्यबळ व इतर पायाभूत सुविधा उपलब्ध झाल्यानंतर विद्यार्थ्यांची प्रवेश प्रक्रिया राबविण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय मा.मंत्रीमंडळाच्या दि.२८.०६.२०२३ रोजीच्या बैठकीतील विषय क्रमांक १४ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने तसेच वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.१७९/२०२३/व्यय-१, दि.०५/०७/२०२३ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२३०७१३१७२३४०७२०१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

EKNATH RAJARAM DAWALE

Digitally signed by EKNATH RAJARAM DAWALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=499dd4df91587ffef1e20a2ee9e560dd0777e49ff6cfc838f362fdbb58c58e7b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=17E427867F9F7ACF49F42A7E5B92B77D56EC1F261F185C142A9F28D7626190FB, cn=EKNATH RAJARAM DAWALE
Date: 2023.07.13 17:28:51 +05'30'

**( एकनाथ डवले )**
**प्रधान सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल महोदय यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री, यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री (कृषि), मंत्रालय, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मुख्य सचिव, यांचे सहसचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सदस्य सचिव तथा महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
८. कुलगुरू, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
९. कुलसचिव,डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला.
१०.नियंत्रक,डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
११.जिल्हाधिकारी,बुलढाणा.
१२.उपविभागीय कृषि अधिकारी,बुलढाणा.
१३. महालेखापाल,महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा/ उप कोषागार अधिकारी, बुलढाणा.
१५. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१६. उप लेखा परिक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१९. अवर सचिव वित्त विभाग (व्यय-१),मंत्रालय, मुंबई.
२०. अवर सचिव नियोजन विभाग (कार्यासन- १४३१ ), मंत्रालय, मुंबई.
२१. निवडनस्ती (कार्यासन-७ अे).